जे जे देव भाग घेती । त्यांही दोघी तृप्त होती ॥ ३ ॥

( १२ )

लोक लोकपाल होतां । करी आत्मा अन्नचिन्ता ॥ १ ॥
जलमुख्य भूतें घेऊन । निर्मी जराचर अन्न ॥ २ ॥
वागादिकें भोक्तृवर्ग । अन्न भक्षूं इच्छी सवेग ॥ ३ ॥
परी नोहे अन्नाहार । मग अपानें करी आहार ॥ ४ ॥
आयुर्हेतु अन्नद्वारा । अन्नग्राह करावया ॥ ५ ॥

( १३ )

आत्मा म्हणे वागादिक । कामें करिती मत्सेवक ॥ १ ॥
हे स्वतंत्र होतां जाण । मग कोण मी होईन ॥ २ ॥
आप आपणा ओळखाया । देहीं जाऊं कोठोनीयां ॥ ३ ॥
ऐसा विचार करित । शिर भेदुनि जायी आंत ॥ ४ ॥
जे जाती करुनी भेद । ह्या द्वारा त्यां हो आनंद ॥ ५ ॥

( १४ )

क्रियोपाधिक जो प्राण तो प्रवेशे । पायांतून असें वदे वेद ॥ १ ॥
गळ्याखालीं कर्मेंद्रियांचें बाहुल्य । धींद्रियबहुत्व कंठावरी ॥ २ ॥
वरुनी प्रवेश ज्ञानोपाधिकाचा । हो ज्ञानेंद्रियांचें वरि बाहुल्य ॥ ३ ॥

( १५ )

पुरीं राव येतां पुरपौरा शोभा । तसी देहीं शोभा आत्मयोगें ॥१॥
वाडा करोनिया तीन मजल्यांचा । खेळ आत्मयाचा त्र्यवस्थेनें ॥२॥
नेत्रीं चित्तीं कंठीं जागृत् निद्रा स्वप्न । तिघांसही स्वप्न म्हणे वेद॥३॥
अन्यथा ग्रहण तेंचि होय स्वप्न । हें असें लक्षण जागृत स्वापा ॥ ४ ॥
दैनंदीन क्रीडा येथें तीन देहीं । मातृपितृस्वदेहीं जन्मांतर ॥ ५ ॥

(१६)

अशीं लाखो जन्में होतीं। परी जीवा न ये मुक्ति ॥ १ ॥
जेव्हां सत्संग आदरी। प्रेमें दत्तभक्ति करी ॥ २ ॥
तेव्हां साधनें जोडून। गुरुवाक्या घे उमजून ॥ ३ ॥
मीच भूत भौतिकही। मज वाचुनि कांहीं नाहीं ॥ ४ ॥

(१७)

तो प्रविष्ट मी मज पाहें। व्यापकत्वें मुक्त राहें ॥ १ ॥
होयी इंद्र त्याचें नाम। परि तया इंद्र नाम ॥ २ ॥
इंद्रनाम हो परोक्ष। देवा आवडे परोक्ष ॥ ३ ॥
अपवाद हा विचार। वासुदेवा साक्षात्कार ॥ ४ ॥

(१८)

अध्यारोपीं देहत्रयप्रवेश न। वैराग्य कारण तेंचि होय ॥ १ ॥
अशुचि गंधानें न विटे जो चित्तीं। तया न विरक्ती तीनी लोकीं ॥२॥
मु ताचें आधण विष्ठेचा दांथर। उकडे तयावरती जीव ॥ ३ ॥
अ शुद्ध विटाळीं जठराग्नि पोळे। तयाचें सोवळें कायसें हो ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे वीट आणि कष्ट। सांगे वेद स्पष्ट वैराग्यार्थ ॥ ५ ॥

(१९)

स्वर्गनरकादिक्रमें ओषधिस्थ। पुरुषदेहीं रेत होत जीव ॥ १ ॥
पुरुषाच्या देहीं पूर्वीं तीन मास। करी जीव वास देही व्हाया ॥२॥
सप्तधातु तापें कढोनी हो रेत। हाचि गर्भ ख्यात तातदेहीं ॥ ३ ॥
सर्वांगें करून पोशिलें जें रेत। चित्तीं तें कढत कामाग्नीनें ॥ ४ ॥
योनीमध्यें सोडी ऋतुकाळीं स्त्रीच्या। जन्म हो जीवाचा पहिला हा ॥ ५ ॥

(२०)

अस्थि स्नायु मज्जा होय तातरेत। त्वचा मांस रक्त स्त्रीरक्ताचे ॥१

[illegible]धिक्यें नारी रेताधिक्यें नर । होयी षंढाकार साम्य होतां ॥ २ ॥
वायु फोडी शुक्र तेव्हां होय मेळ । स्वकर्म केवळ जन्मा हेतु ॥ ३ ॥
जैसें पूर्वकर्म तैसा पिंड होयी । सुख दुःख घेयी ईशाज्ञेनें ॥ ४ ॥

( २१ )

[illegible] पीडे मातेसी रिघोनि उदरीं । स्तनादिकापरी हो मातेसी ॥ १ ॥
भर्तृरूपगर्भा माता परिपाळी । म्हणोनियां पाळी तिला भर्ता ॥ २ ॥
डोहाळे जे होती पति पुरवी ते । न देतां इष्टातें गर्भहानी ॥ ३ ॥
रूपांतर तेंचि आपुलें जाणून । पिता पुंसवनादीक करी ॥ ४ ॥
रूपांतरें भर्ता जन्मे जाया पोटीं । जाया हो शेवटीं भर्तृमाता ॥ ५ ॥

( २२ )

( उपजतां करी जातकर्मादिक । वाढावया लोकपरंपरा ॥ १ ॥
दुसरा हो जन्म उपजतां बाळ । नेणें पुढें काळगती मोहें ॥ २ ॥
गर्भीं पीडिता जो प्राणी मुक्त व्हाया । तया दत्तराया विसरे जीव ।।) ॥ ३ ॥

( २३ )

पुण्य कर्म व्हाया पिता योजी तया । कृतकृत्य काया स्वयें सोडी ॥ १ ॥
जन्मे पुढें तेंचि तिसरें हो जन्म । ऐसें कर्म जन्म अज्ञा मागें ॥ २ ॥
ज्ञाना प्रतिबंध येतांही ये जन्म । वामदेवा जन्म जेवीं आलें ॥ ३ ॥

( २४ )

अग्न्यादि देवांच्या योगें जन्में झालीं । म्हणे मी जाणिलीं वामदेव ॥ १ ॥
लोहापरी देह शेकडोही मातें । राखिती चोरांते जैं पायीक ॥ २ ॥
जेवीं श्येन जाळें तोडोनियां पळे । तेवीं ज्ञानबळें तोडी जन्में ॥ ३ ॥

(२५)

ऐसा पूर्व ज्ञानानुभव घेंवोनी। वामदेव मुनी गर्भी बोले ॥ १ ॥
देहभेदा तोडी आत्मरूपा जोडी। सर्वानंदगोडी घे हो मुक्त ॥ २ ॥

(२६)

होतां हे विरक्ती। विचार करीती। भजावा म्हणती। कोण हा आत्मा ॥ १ ॥
एक देहीं रिघे एक हें अवघें। ऐसे होत दोघे आत्मे येथ ॥ २ ॥
यांपैकीं कोणाची कीजे उपासना। जो जन्ममरणा शीघ्र वारी ॥ ३ ॥
ऐशा विचारानें तया होय बोध। भेद जो विविध त्या बाधिती ॥ ४ ॥

(२७)

जीव जेणें रूपा पाहे। जेणें शब्द ऐकताहे ॥ १ ॥
जेणें गंधा हुंगे जीव। जेणें बोले शब्द सर्व ॥ २ ॥
कडू गोड जेणें जाणें। मनबुद्ध्यादिकें शीणें ॥ ३ ॥

(२८)

हेंचि सर्व हो प्रज्ञान। त्वंपदार्थलक्ष्य जाण ॥ १ ॥
इंद्रादीक देव पंचभूतें जीव। प्रज्ञाना पासाव उद्भवती ॥ २ ॥
प्रज्ञा पाळी सर्वां शेखीं त्यां संहारी। मायावीचे परी वेगळी स्वयें॥ ३ ॥
तेंचि ब्रह्म होय तत्पदलक्ष्यार्थं। दों पदांचा होय लक्ष्यार्थ हा ॥ ४ ॥

(२९)

आहे सामानाधिकरण्य। दोनी पदांचें ह्या जाण ॥ १ ॥
अन्योन्यभेदवारण। हो विशेष्य विशेषण ॥ २ ॥
जीव तोचि हो प्रज्ञान। तेंचि एक ब्रह्म जाण ॥ ३ ॥

(३०)

ऐसें हें श्रवण याचेंचि मनन। कीजे मग ध्यान निरंतर ॥ १ ॥

देहात्मज्ञानाचे परि आत्मज्ञान। होतां न बंधन मागुती हो ॥ २ ॥
शमादिकयुक्त ध्याती जे हें खास। अखंडैकरस लाभे तयां ॥ ३ ॥

(३१)

यावद्देहपात प्रारब्ध भोगीत। तया जीवन्मुक्ती अलिप्तत्वें ॥ १ ॥
न घटे न वाढे पाप पुण्य होतां। महिमा तत्त्वतां ज्ञानीयाचा ॥२॥
ज्ञात्वा होवोनी ह्या देहा सोडोनी। ब्रह्मीं ते मिळोनी जाती मुक्त ॥ ३ ॥

(३२)

ते हृदयग्रंथी तत्काळ तोडीती। संसारा या छेदिती ज्ञानबळें ॥ १ ॥
सर्व पाश त्यांचे तत्काळ तूटती। कर्में क्षया जाती सर्व त्यांचीं ॥२॥
कोठें देह पडो तयां नको काळ। त्यांचें ज्ञानबळ लोकां तारी ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे इतरासुताचें। मत मी हें साचें वाचें बोले ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे वामदेवापरी। जो विचार करी तो हो मुक्त ॥ ५ ॥

---